# इस्लामच सर्वोच्च शिकवणींचा जागतिक धर्म

लेखक

**डॉ. फ़रहत हुसैन**

अनुवादक

**मुहम्मद मुस्तफा**

।। अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे. ।।

# दोन शब्द

आपल्या देशात देशवासीयांना इस्लामविषयी त्रोटक माहिती आहे. इस्लामची जीवनव्यवस्था आणि आंतरराष्ट्रीय धारणांविषयी परिचय देशवासीयांना विशेषत: बुद्धिजीवीवर्गास नाही. गैरसमज व अपसमज विविध कारणांमुळे पसरलेला आहे. उदा० इस्लाम हा मुस्लिमांचा वैयक्तिक धर्म आहे,. इस्लामचे संस्थापक मुहम्मद (स.) आहेत, कुरआन मुस्लिमांचा धर्मग्रंथ आहे आणि मुहम्मद (स.) कुरआनचे लेखक आहेत, इत्यादी. या चुकीच्या वास्तविकतेला दूर करणे अत्यंत गरजेचे आहे.

इस्लामचा आरंभ पृथ्वीवर पहिले मनुष्य आणि पहिले प्रेषित आदरणीय आदम (अ.) ने झाला. आदम (अ.) यांनी एक ईश्वराचे दास्यत्व पत्करले, एक ईश्वराची भक्ती व उपासना केली आणि जीवनात एक ईश्वराचे आज्ञापालन केले. त्यांनी आपल्या वंशास एक अल्लाहवर श्रद्धेची शिकवण दिली. याबरोबरच एकईश्वरत्व, त्याचे पैगंबर (प्रेषित), मरणोत्तर पारलौकिक जीवन, परस्पर बंधुत्व, मानवतेचा संदेश फैलावला.

अल्लाहच्या आज्ञेनुसार जो कायदा (शरीयत) बनला तोच 'इस्लाम' होय. इस्लामच्या आदेशानुसार जो जीवन जगतो त्यास 'मुस्लिम' (आज्ञाकारी) म्हणतात. जगात भिन्न भिन्न काळांत आणि प्रदेशांत एक लक्ष चोवीस हजारपेक्षा जास्त पैगंबरांच्या (प्रेषितांच्या) सतत नियुक्त्या झाल्या. अरबस्थानात अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांचे मक्का शहरी आगमन झाले. मुहम्मद (स.) यांनी अल्लाहच्या आदेशानुसार लोकांसमोर जीवन जगण्याचे मार्गदर्शन केले. या पद्धतीला 'इस्लाम' म्हणतात. पैगंबर मुहम्मद (स.) यांचा संदेश स्वीकारणारे 'मुस्लिम' होय. 'मुहम्मदी' किंवा 'मुहम्मडन' असे संबोधन चुकीचे आहे.

अल्लाहच्या कोणत्याही प्रेषितांनी मग ते इसा (अ.) (येशु) असो वा मूसा (अ.), एखादा धर्म व ग्रंथ वैयक्तिकरित्या प्रस्तुत केला नाही. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या काळापर्यंत जगात अखिल मानवजातीकरिता संदेश पोहोचविण्याची परिस्थिती अनुकूल झाली होती. मुहम्मद (स.) यांनी अल्लाहच्या आज्ञेने संपूर्ण जगातील मानवांना संबोधित केले. सुरुवातीपासून खालील सत्य गोष्टींना वर्णित केले.

* अल्लाह समस्त मानवांसाठी, प्राणीमात्रासाठी, सृष्टीसाठी एकमेव पालनकर्ता, रचयिता आणि नियम-कायदे निर्माता आहे.

* अल्लाहच्या मर्जीचा, प्रसंन्नतेचा, संमतीचा धर्म इस्लाम आहे. इस्लाम समस्त मानवांसाठी

एक मार्ग, कल्याणकारी मुक्तीदाता आहे.

* मुहम्मद (स.) अखिल मानवजातीसाठी पैगंबर (संदेशवाहक) आणि अंतिम प्रेषित आहेत. मुहम्मद (स.) यांनी आपले आयुष्य अल्लाहच्या मर्जीनुसार जगले. त्याचा तपशील सत्य प्रमाणांसह सुरक्षित आहे.

* कुरआन समस्त मानवांसाठी अल्लाहकडून अंतिम मार्गदर्शन आहे. त्याचे अवतरण तेवीस वर्षांच्या अवधित जिब्राईल फरिश्त्यामार्फत टप्प्याटप्प्याने झाले. कुरआन पूर्णत: सुरक्षित आहे. कुरआनात यत्किंचितही बदल झालेला नाही. कुरआनपूर्वीचे ईशग्रंथ सुरक्षित नाहीत, त्यात वेळप्रसंगी बदल झाला आहे. त्या ग्रंथांवर विश्वास असावा मात्र मानवमुक्तीचा मार्ग कुरआनशिवाय अन्य नाही.

ही पुस्तिका 'इस्लाम सर्वांसाठी' या मोहिमेअंतर्गत जमाअते इस्लामी हिंद उत्तर प्रदेश (पश्चिम) द्वारा फेब्रुवारी २०११ मध्ये प्रकाशित झाली. डॉ. फरहत हुसैन द्वारा संकलित ही पुस्तिका पुन्हा निरीक्षण करून प्रकाशित केली जात आहे. या पुस्तिकेच्या अध्ययनाने वाचकगण इस्लामप्रति हे सत्य जाणू शकतील की इस्लाम संपूर्ण मानवजातीसाठी ईश्वराकडून संमत धर्म आहे.

**मुहम्मद इकबाल मुल्ला**

सचिव, जमाअते इस्लामी हिंद

# इस्लामची सर्वोच्च शिकवण

## भूमिका

प्रिय वाचकांनो! जीवन विश्वासावर चालते. जन्मत: आपली आई सर्वांत विश्वासपात्र असते. तिच्यावरील विश्वासाने आम्ही सर्वकाही शिकतो, इथपावेतो की आमचे वडील कोण आहेत, तीच आम्हांस सांगते. शिक्षण प्राप्त करताना आमचा विश्वास शिक्षकांवर असतो. आजारी असताना उपचारासाठी डॉक्टरवर विश्वास असतो. खटल्यात वकिलावर विश्वास ठेवतो. आम्ही दृढ विश्वासाने सांगू इच्छितो की मानवी समस्या निवारण करण्यासाठी, जीवनातील पेच सोडविण्यासाठी आणि जगात मनुष्याचे अस्तित्व कशासाठी? तसेच मरणोत्तर जीवनासंदर्भात मार्गदर्शन प्राप्त करण्यासाठी एक अतिविश्वासपात्र व्यक्ती आहे, जी आई, शिक्षक, डॉक्टरपेक्षाही अधिक विश्वासपात्र आहे, ती आहे प्रेषित मुहम्मद (स.)! त्यांचे अस्तित्व विश्वासपात्र या कारणासाठी की जग साक्षी आहे त्यांनी कधीही खोटे बोलले नाही, कोणास धोका दिला नाही. आपल्या व्यक्तीपूजेपासून लोकांना रोखले, दानधर्म (जकात) ची धनराशी स्वत:साठी व संततीसाठी निषिद्ध केली. पूर्ण सामर्थ्य प्राप्त झाल्यानंतर, सर्व सत्ता अधीन झाल्यानंतरदेखील कट्टर शत्रुला ज्यांत त्यांचे प्रिय काकांचा खुनी ज्यांनी हत्येनंतर काकांचे काळीज चर्वित केले, त्याससुद्धा क्षमादाने केले. अशा महान व्यक्तीवर विश्वास न ठेवणे कोणत्याही प्रकारे बुद्धिसंगत नाही.

प्रेषित मुहम्मद (स.) प्रत्येकास याची जाणीव करून देतात की इस्लाम सर्वांचा स्वत:चा धर्म आहे. पूर्वीपासून चालत आलेला हा मूळ स्वाभाविक धर्म आहे. पूर्वीच्या धर्मांची ओळख त्यात रद्दबातल झाल्याने, कालानुसार बदलल्याने, भाषाशैलीत परिवर्तन झाल्याने, सुरक्षितता न लाभल्याने, स्वार्थी लोकांनी केलेल्या फेरबदलाने मूळ शुद्ध स्वरूपात ज्यास ईश्वराने अवतरित केले होते, उपलब्ध नाही. आता प्रेषित मुहम्मद (स.) शुद्ध आणि मूळ स्वरूपात त्या शिकवणी सांगत आहेत. लोकहो! हाच तर तुमचा खजिना आहे, तुमचा वारसा आहे. ही ठेव प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याद्वारे पुन्हा प्राप्त करा. भारतीय धर्मग्रंथ, मुहम्मद (स.) हे अंतिम ऋषी आहेत या शुभसूचनेने व्याप्त आहेत. मुहम्मद यांना संस्कृत भाषेत 'नराशंस' म्हणतात. चारही वेदांमध्ये स्पष्ट प्रमाणांसह नराशंस ऋषीच्या आगमनाची पूर्वसूचना आहे. काही श्लोकांत 'मामहे' ऋषि आणि 'कल्कि अवतार' म्हटले गेले. मुहम्मदविषयी भविष्य पुराण आणि संग्राम पुराणात भविष्यवाणी उल्लेखित आहे. बौद्ध धर्मग्रंथात मुहम्मदविषयी सूचना आहे. (संदर्भासाठी पाहा- हजरत मुहम्मद और भारतीय धर्मग्रंथ -डॉ. एम. ए. श्रीवास्तव). यावरून स्पष्ट होते की मुहम्मद (स.) केवळ मुस्लिमांसाठी नसून समस्त मानवांसाठी आहेत.

समस्त मानवतेचे हितचिंतक मुहम्मद (.स) यांनी ज्या जीवनपद्धतीकडे आवाहन केले, त्यास व्यवहारत: अरब भूभागात स्थापित करून दाखविले. जगाने इतिहासात याची नोंद घेतली आहे. या सुंदर व सुखसमाधानी क्रांतीस अनुभवले. त्या जीवनपद्धतीचा, अर्थात इस्लामचा संक्षिप्त परिचय आपल्यासमक्ष प्रस्तुत आहे. प्रारंभी याविषयी विचार करू की मानवास जीवनपद्धतीची आवश्यकता का आहे? ही जीवनपद्धती कोण निर्धारित करील? प्रत्यक्षदर्शी या शिकवणीवर आधारित आदर्श म्हणून कोणत्या व्यक्तीचे अनुसरण करावे?

## जीवनपद्धतीची आवश्यकता

जगात केवळ मनुष्य असा प्राणी आहे ज्यास विचार करण्याचे स्वातंत्र्य आहे, कर्म करण्याचे स्वातंत्र्य आहे. यामुळे जीवन जगण्यासाठी मनुष्यास एका पद्धतीची आवश्यकता आहे. पाण्यास प्रवाह असतो जो उंचीवरून खाली वाहत असतो. हा पाण्याचा मार्ग होय. मनुष्य निव्वळ असा प्राणी नाही जेणेकरून निसर्गनिर्मितीनुसार वाटचाल करावी आणि त्यास सन्मार्ग लाभावा. जीवनाच्या विशाल क्षेत्रात त्यास निश्चित मार्ग सतत प्राप्त होत नाही. विचारपूर्वक मार्ग चोखाळावा लागतो. जीवनाच्या मूलभूत प्रश्नांचे समाधान करण्यासाठी त्यास दिशा-मार्गदर्शन पाहिजे. व्यक्तिगत संबंधासाठी, सभ्य आणि सदाचरणी जीवन जगण्यासाठी त्यास सन्मार्गरुपी पद्धत पाहिजे. एक व्यक्तिगत घटक, समाज व राष्ट्र स्वरूपी जीवन जगण्यासाठी गृहस्थ, कुटुंब-परिवार, उपजीविका प्राप्त करण्याच्या जबाबदारी पूर्णतेसाठी मार्गदर्शन पाहिजे. जीवनाच्या उद्देशप्राप्तीसाठी, जीवनाच्या परम लक्ष्याच्या ज्ञानप्राप्तीसाठी त्यास 'मार्गदर्शन' पाहिजे.

## मनुष्यास निर्माण करणाराच जगण्याची निर्धारित पद्धत देतो

कोणत्याही वस्तुचा निर्माता, त्या वस्तुची कार्यशैली निश्चित करतो ही तर्कसंगत व विवेकपूर्ण गोष्ट आहे. कोणत्याही लहानातल्या लहान यंत्राविषयी त्याबरोबर ती हाताळायची पुस्तिका (मॅन्युअल) असते. भूतलावर 'मनुष्य' तर अल्लाहची सर्वोत्कृष्ट निर्मिती आहे. मनुष्यनिर्माता अल्लाहच 'जीवनपुस्तक' देण्याचा, जीवनउद्देश, जीवनलक्ष्य, जीवनसाध्य दर्शविण्याचा परिपूर्ण मालक आहे. मनुष्याने स्वत:हून आपल्या बुद्धीने, भिन्न लोकांच्या मतांनी जीवनाचा उद्देश निश्चित करणे अविवेकीपणाचे होय.

जीवनात मनुष्यांच्या अनिवार्य आवश्यकता काय आहेत, त्याची पूर्तता त्यांनी

कशी करावी, याविषयी संतुलित व्यवस्था भूतलावर अल्लाहने केली आहे. कारण तोच मानवाचा व विशाल सृष्टीचा रचनाकार आहे. त्याने अन्न, वस्त्र, निवाराविषयी समस्त साधनांची उपलब्धता केली. माणसाची आध्यात्मिक आवश्यकता, जीवन व्यंतीत करण्याची पद्धत दर्शविण्यासाठी मार्गदर्शक म्हणून पैगंबरांना (प्रेषित, संदेशवाहक) नियुक्त केले. या प्रेषितांनी आपापल्या भूमीक्षेत्रात, दिलेल्या कालावधीत माणसांना मार्गदर्शन केले. जेव्हा जग वैश्विक एकसंघ स्वरूपाचे झाले, विज्ञानाने महान प्रगती केली, तेव्हा अल्लाहने अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांना अंतिम ईशग्रंथ 'पवित्र कुरआन' प्रदान केला. हा संदेश अखिल मानवजातीसाठी जीवनमार्गदर्शन आहे. इतिहासकाळातील सर्व प्रेषितांच्या मालिकेतील अंतिम प्रतिनिधी मुहम्मद (स.) आहेत. पवित्र कुरआन मागील सर्व धर्मग्रंथांचा शुद्ध, निर्भेळ सारांश आहे. हा 'इस्लाम' होय. इस्लाम परिपूर्ण जीवनप्रणाली, मनुष्यजीवनाच्या प्रत्येक समस्येचे, प्रश्नाचे निवारण करते. या ईश्वरप्रदत्त प्रणालीमुळे जीवनात त्रुटीरहित, शाश्वत समाधान प्राप्त होते. या इस्लामी तत्त्वांचा अंगीकार करून मनुष्य मानसिक समाधान प्राप्त करतो, मरणोत्तर जीवनात अनंतकालिन साफल्य प्राप्त करतो. इस्लाम सन्मार्ग दाखविणारा प्रकाश आहे. यास अस्वीकार केल्याने जीवन अंधारात व त्रासात कंठावे लागते.

## नामाभिदान

'इस्लाम' या विशेषनामाचा विचार करू. जगातील प्रचलित धर्मांचे नाव एखाद्या व्यक्तीच्या नावाने किंवा एखाद्या जातीच्या नावाने आहे. परंतु इस्लाम हे नाव व्यक्ती किंवा जातीशी निगडीत नाही. इस्लाम या नावात वैशिष्ट्य आहे. यामुळे स्पष्ट होते की हे नाव एखाद्या व्यक्तीच्या बुद्धीची उपज नाही आणि एखाद्या जातीशी मर्यादितसुद्धा नाही.

'इस्लाम' अरबी भाषेतील शब्द आहे. याचा अर्थ शांती, सुरक्षितता, आज्ञापालन आणि समर्पण. इस्लाम जीवनप्रणाली आहे. या जीवनपद्धतीत मनुष्य अल्लाह जो पालनकर्ता आहे स्वत:स त्याच्यासमोर समर्पित करतो, अल्लाहच्या आज्ञेचे, हुकुमाचे, कायद्याचे पालन करतो. अल्लाहच्या आदेशानुसार, मार्गदर्शनानुसार जीवन जगतो. अशा जीवनपद्धतीने मनुष्य जगातील जीवनात सुख, शांती, समाधान प्राप्त करतो आणि मृत्यूनंतर पारलौकिक जीवनात अमर सुख व आनंद प्राप्त करतो. इस्लामवर ज्याची श्रद्धा आहे त्यास 'मुस्लिम' किंवा 'मुसलमान' संबोधिले जाते.

# मूलभूत श्रद्धा

इस्लामच्या तीन मौलिक धारणा आहेत.

## १) एकेश्वरत्व

इस्लामच्या मूलभूत श्रद्धेत सर्वाधित महत्त्वपूर्ण धारणा एक अल्लाहवर विश्वास ठेवणे आहे. मानव आणि संपूर्ण विश्वाचा निर्माणकर्ता, वास्तविक स्वामी, शासक आणि नियंता एकमेव 'अल्लाह' आहे. अल्लाहने सर्व सृष्टी, विश्व निर्माण केले. तोच हे विश्व चालवतो. प्रत्येक वस्तुला अस्तित्वात राहण्यासाठी ज्या ऊर्जेची गरज आहे, ती ज्या प्रमाणात पाहिजे, ती ऊर्जाशक्ती अल्लाहच प्रदान करतो. प्रभुसत्तेचे समस्त गुण 'अल्लाह'मध्ये आहेत. अन्य कोणी अणूमात्र त्याचा भागीदार नाही. तो आदि आहे, सदैव आहे आणि तोच अनंत आहे व तोच सदैव राहणारा आहे. बाकी त्याशिवाय सर्वकाही नाशवंत आहेत. तो कोणाचीही संतान नाही. कोणत्याही उणीवेपासून तो अलिप्त आहे. भूत, वर्तमान, त्याला भविष्यकाळचे प्रत्यक्ष व परोक्ष ज्ञान आहे. तोच एकमेव मानवाचा वास्तविक उपास्य आहे. एकमेव अल्लाहच्या भक्तीमध्ये, उपासनेमध्ये, पूजेमध्ये दुसऱ्या कोणत्याही प्रकारास सामील करणे विवेकपूर्ण आणि न्यायसंगत नाही. एकमात्र आज्ञापालनास अल्लाहच पात्र आहे. केवळ त्याचेच मार्गदर्शन स्वीकारले पाहिजे. माणसांनी आपल्या इच्छा, आकांक्षा, अभिलाषा अल्लाहजवळच मागाव्यात. आभार आणि कृतज्ञतेचा तो अधिकारी आहे. कारण अल्लाहनेच आमचे अस्तित्व निर्मिले, जीवनसामग्रीची उपलब्धता केली, पैगंबरांना (प्रेषितांना) नेमून सत्यमार्ग दाखविला.

## २) प्रेषित्व (ईशदूतत्व)

माणसाला या जगात मार्गदर्शनासाठी, व्यावहारिक जीवनात मार्गदर्शनासाठी प्रत्येक काळात प्रेषित पाठविले. प्रेषितांनी अल्लाहकडून मिळालेल्या आदेशानुसार, शिकवणीनुसार आपल्या कार्यक्षेत्रात लोकांचे मार्गदर्शन केले. अल्लाहचा संदेश आपल्या वाणीने आणि आचरणाने पोचवले. समाजास सदाचाराकडे अग्रेसर केले. दुराचारापासून, अनाचारापासून मुक्त करण्याचे कठीण काम केले. मानवांनी ज्या वेळी सभ्यतेच्या वैश्विक युगात प्रवेश केला, जग जवळ आले त्या वेळी प्रेषित मुहम्मद (स.) यांना विश्वव्यापी संदेश देऊन प्रस्तुत केले. हा अमोल संदेशठेवा दोन प्रकारे उपलब्ध आहे. एक ईश्वरवाणी जी कुरआनच्या स्वरूपात अक्षरशः सुरक्षित आहे आणि दुसरे स्वरूप मुहम्मद (स.) यांचे कथन, आचरण, आदेश-निर्देश म्हणजे 'हदीस' होय. इस्लामी धारणेनुसार अल्लाहच्या सर्व प्रेषितांवर श्रद्धा ठेवणे आवश्यक आहे. परंतु अंतिमतः प्रत्यक्ष वास्तविक

व्यवहारासाठी व आचरणासाठी प्रेषित मुहम्मद (स.) यांचे अनुसरण, अनुकरण अनिवार्य आहे. कारण त्यांच्या शिकवणी व मूलतत्त्वे, ईशआज्ञेचे, विधानाचे अंतिम संस्करण आहे.

डॉ. वेदप्रकाश उपाध्याय आणि अनेक विद्वान पंडितांनुसार सनातन धर्माच्या प्रामाणिक ग्रंथात, वेद आणि पुराणात जी व्यक्ती 'नराशंस ऋषि', 'मामहे ऋषि', 'महामद' आणि अंतिम अवतार 'कल्कि अवतार'ची भविष्यवाणी स्पष्ट शब्दांत उल्लेखित आहे, ते प्रेषित मुहम्मद (स.) होय. यावरून स्पष्ट होते की प्रेषित मुहम्मद (स।) हे भारत देशासाठी पूर्णपणे प्रासंगिक आहेत.

## ३) मरणोत्तर, पारलौकिक जीवन (आखिरत)

इस्लामची तिसरी मौलिक धारणा आहे मरणोत्तर, पारलौकिक जीवनावर विश्वास. जगातील जीवनात मनुष्य बेजबाबदार नाही. त्यास अल्लाहसमोर जीवन कसे व्यतीत केले याचा जाब द्यावा लागेल. या ऐहिक जीवनानंतर पारलौकिक जीवन आहे. एक वेळ अशी येणार ज्या वेळी हे संपूर्ण विश्व संपुष्टात येईल. प्रलय (कयामत) येईल. तद्नंतर सर्व लोकांना पुनश्च जाब विचारण्यासाठी जीवन दिले जाईल. हा अंतिम न्याय-निवाड्याचा दिवस असेल. अल्लाहचे न्यायालय स्थापित होईल. या न्यायालयात माणसाच्या ऐहिक जीवनाचे दप्तर त्यांच्या सर्व कर्मांनिशी साक्ष आणि पुराव्यानिशी प्रस्तुत केले जाईल. या अल्लाहदरबारी शिफारस, लाच आणि या जगातील दर्ज्यांना स्थान नसेल. अल्लाह प्रत्येक व्यक्तीच्या चांगल्या-वाईट कर्मांचा पुरेपूर हिशोब घेईल. माणसांनी जीवनात अल्लाहच्या आदेशानुसार-आज्ञेनुसार, प्रेषिताच्या आचरण-अनुकरणाने जीवन जगले किंवा स्वत:च्या ऐच्छिक स्वैर इच्छे-मर्जीनुसार जीवन घालवले ते पाहिले जाईल. ज्यांचे कर्म सद्गुणी असतील ते सफल होतील, स्वर्गाचा आनंद त्यांना प्राप्त होईल, तेथे ते सदैव राहतील. ज्यांच्या कर्मनोंदीत अल्लाहच्या आदेशांचे उल्लंघन, अवज्ञा, उदंडता, अत्याचार अधिक असेल, ते शिक्षेस पात्र ठरतील, त्यांना नरकाच्या यातना कायमस्वरुपी भोगाव्या लागतील.

मनुष्याचा आंतरिक स्वभाव निष्पक्ष, न्यायपूर्ण व्यवस्थेची मागणी करतो. दुष्ट लोकांना, अत्याचारी-पापी लोकांना ज्यांनी दुर्बल, गरीब, पीडित, अशक्त लोकांवर अत्याचार केला, ज्यांनी लोकांना सन्मार्गापासून रोखले, ज्यांनी जमिनीवर दंगली, भांडण-तंटे व उपद्रव पसरविला अशा दुष्कर्मी लोकांना सार्वजनिकरित्या शासन व्हावे. ज्या लोकांनी अनेक कष्टमय यातना सोसून सत्यमार्ग सोडला नाही, ज्या लोकांनी जालीम-अत्याचारींशी संघर्ष केला, ज्या लोकांनी तन-मन-धनाने दुःखी व पीडितांची सेवा

केली, अशा सत्कर्मी लोकांना सार्वजनिकरित्या इनाम बहाल व्हावे. पारलौकिक जीवन वरील मागणीची पूर्तता करते.

## भक्ती, उपासना

भक्तीचे स्वरूप पूजा-उपासनापुरते मर्यादित असणे इस्लामला मान्य नाही. इस्लामच्या शिकवणीनुसार प्रत्येक भौतिक कार्य असो वा आध्यात्मिक कार्य असो, अल्लाहच्या आदेशानुसार जर केले गेले तर त्याची गणना भक्तीमध्येच होईल. घर-संसार चालवणे, व्यापर, सामाजिक, कौटुंबिक कामे जर ईशसंकेतानुसार केले तर तीदेखील भक्ती व उपासनाच आहे. मुस्लिम मूलत: अहोरात्र अल्लाहचा दास, उपासक, गुलाम आहे, याचे सातत्याने स्मरण होत राहावे म्हणून चार आवश्यक उपासना-प्रकार निर्धारित आहेत, जे इस्लामचे स्तंभ मानले जातात.

### १) नमाज

नमाज ईशभक्तीची सर्वश्रेष्ठ पद्धत आहे. नमाजअंतर्भूत ईशस्तुती, उपासना, वंदना, पूजा, आराधना, स्मरण, चिंतन, प्रार्थना, याचना इत्यादी सर्वकाही आहेत. ईमानधारक प्रत्येकाने रात्रंदिवस-चोवीस तासांत पाच वेळा निर्धारित वेळी नमाज अदा करणे अनिवार्य आहे. नमाजद्वारे मनुष्य अल्लाहने त्यावर जे उपकार केले आहेत त्याची कृतज्ञता आंतरिक-बाह्य स्वरूपात प्रकट करतो. नमाज अल्लाहचे श्रेष्ठतम गुणगान आहे. मनुष्य अल्लाहसमोर सजदा (नतमस्तक) करतो, अल्लाहच्या आदेश-निर्देशाकडे ध्यान केंद्रित करतो. नमाजमुळे कर्तव्यपूर्ती, कर्तव्यतत्परता होते. नमाजची पुनरावृत्ती चारित्र्यनिर्माण कार्यात सहाय्यक ठरते. सामूहिक, संघीय स्वरूपात मशिदीत एकत्रित नमाज अदा केल्याने सामाजिक बंधुत्व, समता, ऐक्य निर्माण होते. श्रीमंत-गरीब, लहान-मोठे, अधिकारी-कर्मचारी, राजा-रंक सर्वजण खांद्यास खांदा लावून एकत्रित नमाज अदा करतात. त्यामुळे उच्च-नीच, स्पृश्य-अस्पृश्य, वर्णभेद, रंगभेद, भाषाभेद, आदि भेदभाव नष्ट होतात. आदर्श नैतिकता तर प्राप्त होतेच शिवाय अधिक बोनस म्हणून स्वास्थ्यलाभ प्राप्त होतो.

### २) जकात (गोरगरिबांना अनिवार्य दान देणे)

जकात समाजातील आर्थिक दारिद्र्याने पछाडलेल्या लोकांच्या सहाय्यतेसाठी दिले जाणारे अनिवार्य दान होय. आर्थिक सुबत्ता असलेल्या प्रत्येक मुस्लिमाने जमा धनसंपत्तीतून शेकडा अडीच टक्के जकात गरजवंतांना दिली पाहिजे. गरिबांना भीक किंवा टॅक्सच्या रूपाने नव्हे तर धनसंपन्न व्यक्तीच्या मिळकतीत गरीब व वंचितांचा हा हक्क आहे.

आर्थिक दृष्टीने जे कमकुवत होतात, एखाद्या संकटात सापडतात किंवा आपदाग्रस्त होतात, घरात मिळकतीची ऐपत असणारा निधन पावतो, त्याच्या मागे अनाथ मुले, विधवा असहाय होतात, अशांच्या मूलभूत गरजांच्या पूर्ततेसाठी हा सामाजिक विमा आहे. जकातचा आणखीन फायदा असा की आपल्या उत्पन्नातून जकात या माध्यमाद्वारे खर्च करून मनुष्य अल्लाहच्या प्रसन्नतेस पात्र ठरतो, त्याअंगी स्वार्थीपणा जाऊन त्याग व बलिदानवृत्ती निर्माण होते. कंजुषी, धनलालसा व संकुचित मनोवृत्ती दूर होते. जे रंजलेले, गांजलेले आहेत, गरिबीने दु:खी आहेत त्यांच्याविषयी आपुलकी व सहानुभूती उत्पन्न होते.

जकात इस्लाममध्ये एक उपासना आहे, पण आर्थिक जगताचा हा प्राणवायु आहे. जकातच्या देण्याने बाजारात धनसंपत्ती प्रवाहित होते. गरजवंताच्या हातात पैसे आल्याने बाजारात मालाला व देवाणघेवाणास मागणी होते. यामुळे रोजगार वाढतो. समाज आर्थिक खुशालीकडे अग्रेसर होतो. दरवर्षी धनवानांच्या मालातून वा संपत्तीतून शेकडा अडीच टक्के गरिबांकडे गेल्याने, गरीब-श्रीमंत यातील दरी यथावकाश कमी होते, आर्थिक असमानता घटत जाते. लक्षात असू द्या, सद्याच्या काळात संपत्तीची असमान विभागणी व वितरण, आर्थिक विश्वात मोठी समस्या बनली आहे.

## ३) रोजा (उपवास)

इस्लामी कॅलेंडर हिजरी सनामुसार रमजान महिन्यात पूर्ण एक महिना रोजे ठेवणे अनिवार्य उपासना आहे. रोजा धारण केल्याने मनुष्य संयमी व सदाचारी बनतो. रोजाच्या नियमावलीत पहाटेच्या वेळेपासून सूर्यास्तापर्यंत खाणे-पिणे, संभोग निषिद्ध आहे. दुर्गुणांपासून अलिप्त राहण्याचा आदेश आहे. सद्‌गुणास प्रेरित करण्यात आले आहे. कितीही भूक वा तहान असताना अन्नाचा कण, पाण्याचा थेंब घेता कामा नये. अल्लाह पाहतो आहे हा विश्वास तो एकटा असतानादेखील त्याच्या ध्यानीमनी असतो. अल्लाह सर्वव्यापी आहे. त्याच्या दरबारी जाब द्यावा लागणार आहे यावर दृढ श्रद्धा असते. यात प्रेषितांचे अनुकरण आहे. धीराने संकटाचा मुकाबला करण्याचा हा अभ्यास आहे. मनाच्या इच्छा वासनास अल्लाहच्या प्रसन्नतेखातर नियंत्रित ठेवण्याची शक्ती रोजामुळे प्राप्त होते. रोजा मनुष्यास भुकेची जाण करून देतो. गरिबांच्या भुकेची कल्पना त्यास येते. अखिल जगात रमजान या एकाच महिन्यात मुस्लिम सामूहिकपणे रोजा पाळतात, त्यामुळे सामाजिक ऐक्य प्राप्त होते. प्रकृतीस रोजामुळे अनेक स्वास्थ्यलाभ होतात. रमजान महिन्याचे रोजे त्यास ताजेतवाने करणारे प्रशिक्षण आहे, ज्यामुळे मनुष्यास दरवर्षी सन्मार्गावर दृढ ठेवते व त्यावर चालत राहण्याची शक्ती प्राप्त होते, त्याबरोबरच श्रद्धेत बळकटी येते, वृत्ती संयमशील होते, चारित्र्यसंपन्नता येते.

### ४) हज

चौथे अनिवार्य कर्तव्य हज करणे आहे. ज्यांची ऐपत अरबस्तानात मक्केस जाणे-येणेची आहे अशांना जीवनातून एका वेळी हज करणे, उपासना आहे. चार हजार वर्षांपूर्वी मक्का येथे प्रेषित इब्राहीम (अ.) यांनी अल्लाहच्या उपासनेसाठी एक काबागृह निर्माण केले. यास अल्लाहने इस्लामचे केंद्र बनविले. नमाजसाठी तोंड त्या दिशेकडे करण्याचा आदेश आहे. काबागृहाकडे येण्यापूर्वी अंत:करण शुद्ध असावे; वासना, रक्तपात, दुष्कर्म व कटूवचने आदि अनाचारापासून दूर असावे.

इस्लामी सन हिजरीच्या जिलहिज्जा महिन्यात साऱ्या जगातून मुस्लिम हजसाठी मक्का शहरी एकत्र होतात. सर्वजण एकाच पेहरावात दोन पांढऱ्या चादरी लपेटून एकेश्वरत्वाचे केंद्र काबागृहाकडे एकवटतात, काळ्या-गोऱ्याचा, राजा-प्रजेचा, अमेरिकन-आफ्रिकनचा, देश-विदेशातील भिन्न भाषा बोलणाऱ्यांचा, विविध वयोमानाचा, विविध शरीरयष्टींचा कोणताच, कसलाच भेद अस्तित्वात नाही. सर्वजण एकसमान आहेत. विश्वस्तरावरील बंधुत्वाचे यापेक्षा अन्य ठिकाणी उदाहरण नाही. येथे ईमान (श्रद्धा) ताजेतवाने होते. इस्लामी भूतकाळ समोर येतो. याच ठिकाणाहून प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपले कार्य आरंभिले. विरोधकांनी याच ठिकाणी प्रेषितांना स्थलांतर (हिजरत) करण्यास विवश केले. तद्नंतर केवळ दहा वर्षांनी विजयपताका घेऊन याच नगरात प्रेषित मुहम्मद (स.) यांचे यशस्वी पदार्पण झाले. सर्व शत्रुंना, विरोधकांना सार्वत्रिक क्षमादानाची घोषणा करण्यात आली, या वर्तणुकीने मानवी इतिहास थक्क आहे. या गोष्टी हजयात्रेकरू आपल्या डोळ्यांसमोर पाहतो, या गडद आठवणी घेऊन तो आपापल्या स्थळी परततो.

## कुरआन मानवतेसाठी वरदान आहे

इस्लामच्या मौलिक धारणा आणि शिकवणीचा मूळस्रोत पवित्र कुरआन हा ईशग्रंथ आहे जो प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर तेवीस वर्षांच्या काळात अवतरित झाला. हा पवित्र ग्रंथ आपल्या मूळ अरबी भाषेत अक्षरश: सुरक्षित आहे. या ग्रंथाचे श्लोक अवतरित होत असताना मुहम्मद (स.) त्यास लिहून ठेवण्याचा प्रबंध करत. प्रेषितानंतर पहिले खलीफा (उत्तराधिकारी) माननीय अबुबक्र सिद्दीक (र.) यांनी ग्रंथ स्वरूपातील प्रती तयार करून सुरक्षित ठेवल्या. तिसरे खलीफा माननीय उस्मान (र.) यांनी या पवित्र कुरआनच्या प्रती काढून त्या इस्लामी जगातील सर्व केंद्रांत पाठविल्या. त्यातील दोन प्रती आजपण ताश्कंदच्या ग्रंथालयात व इस्तंबुल (तुर्की) च्या म्युझियममध्ये आहेत. याव्यतिरिक्त

असंख्य मुस्लिम बांधव, लहान मुलं आदी सुरुवातीच्या काळापासून आजतागायत कुरआन अक्षरश: मुखोद्गत पाठ करतात. दररोज नमाजमध्ये कुरआन आयतींचे पठण होते. रमजान महिन्यात पूर्ण कुरआन ऐकविला जातो, लिखित व पाठांतर या दोन्ही स्वरूपात कुरआन सुरक्षिततेची परिपूर्ण व्यवस्था असते. कुरआनची अरबी भाषा आज जगात जनसामान्यांत जीवंत असून अनेक देशांत बोलली, लिहिली व प्रकाशित केली जाते. जगातील कोट्यवधी लोक अरबी भाषेचा व्यवहारात वापर करतात. दिड हजार वर्षांपासून अरबी भाषेच्या व्याकरणात, शब्दरचनेत फरक आलेला आहे. कुरआनच्या अर्थास व स्पष्टीकरणास समजणे कठीण नाही.

कुरआनची वर्णनशैली अद्‌भूत, विस्मयजनक आहे. याचे वाचन करताना मनुष्य गहिवरतो आणि म्हणतो की खरोखर ही मनुष्यवाणी नाही, ही तर ईशवाणी आहे. मनुष्य जीवनातील प्रत्येक विषयावर विवेचन करताना त्यात कुठेही विरोधास किंवा अंतर नाही. मागील दिड हजार वर्षाच्या काळात जग पार बदलून गेले पण कुरआनने दर्शविलेल्या नियम, तत्त्व व सिद्धान्तांत कुठे चूक सिद्ध झाली नाही. त्या वेळी अरबस्थानाच्या वाळवंटातील खेडुतापासून नंतर आफ्रिकन, आशियन, युरोपियन देशांत आणि हल्लीच्या प्रगतीशील, समाजाच्या मार्गदर्शनात कुरआनचे सिद्धान्तच अग्रेसर आहेत, हा आमचा विश्वास आहे. वर्तमानकाळातील गुंतागुंतीच्या समस्यांचे निराकरण व समाधान कुरआनच्या मार्गदर्शनानेच सुलभ होते. वस्तुत: कुरआन हा अल्लाहकडून अखिल मानवजातीसाठी सर्वश्रेष्ठ देणगी आहे. कुरआन एखाद्या जातीची, देशाची संपत्ती नसून हा मानवतेसाठी संयुक्त ठेवा आहे.

## प्रेषित मुहम्मद (स.) विश्वनायक आहेत

सत्य हे झाकले जाऊ शकत नाही. सत्य नेहमी सत्य असते. एक प्रतिष्ठित लेखक आणि विद्वान मायकल हार्ट निपक्षपातीपणाने ज्या वेळी खोलवर चिंतन करतो, ख्रिश्चन असतानादेखील तो आपल्या ग्रंथात- 'दी हंड्रेड'मध्ये मानवी इतिहासातील व आजपर्यंतच्या प्रभावशाली शंभर व्यक्तींत प्रेषित मुहम्मद (स.) यांना पहिल्या स्थानावर ठेवतो आणि प्रांजळपणे कबुली देतो की, "इतिहासात मुहम्मद (स.) एकमेव व्यक्ती आहेत जे धार्मिक व सांसारिक (भौतिक) दोन्ही क्षेत्रांत सर्वोच्च सफल आहेत."

प्रेषित मुहम्मद (स.) यांचे जीवन त्या युगातील आहे ज्या वेळी इतिहास लिहिला जात असे. इतिहास लेखक मुस्लिम व मुस्लिमेतर तज्ञ लिहीत होते. प्रेषितांचे जीवन, कार्यक्षेत्र, कारकीर्द सर्वांसमोर आजही उपलब्ध आहे. दस्तूरखुद्द मुस्लिमांनी मुहम्मद

(स.) यांची जीवनशैली, उपदेश, कथन, भाषण, प्रवचन, संवाद आश्चर्यकारक प्रामाणिकतेने विशद केले आहे. हे उदाहरण अनुपम अद्वितीय आहे. प्रेषितांचे परिपूर्ण जीवन जनहितार्थ समर्पित आहे. प्रेषिताच्या काळात अरब लोक मरणे किंवा मारणे एवढेच जाणत होते. लोक मूर्तीपूजक होते, लोकांनी आपले पूर्वज प्रेषित इब्राहीम (अ.) आणि प्रेषित इस्माईल (अ.) यांनी सांगितलेले एकेश्वरत्व विसरले होते. हे अरब लोक आपल्या मुलीस जीवंत गाडत असत. अशा लोकांत मुहम्मद (स.) यांनी आमुलाग्र बदल घडवून आणला. जगासाठी हे आश्चर्यजनक आहे. त्या वेळी मुहम्मद (स.) यांनी ईशआदेश प्राप्त करून समाजात संघर्ष आरंभ केला. तेवीस वर्षांत सर्वकाही बदलून गेले. अपार कष्ट सोसले. दगड-धोंडे सहन केले. संपूर्ण कुटुंबाला अडीच वर्षे शोव अबी तालीबच्या दरीत बंदिस्त करून बहिष्कार टाकण्यात आला. तेथे भाकरीऐवजी कधीकधी झाडांची पाने खाणे भाग पडले. विरोधकांनी सरतेशेवटी मुहम्मद (स.) यांची हत्या करण्याचे षड्यंत्र रचले म्हणून मातृभूमीचा त्याग करून मदीनेस स्थलांतर करावे लागले. विरोधक तेथेसुद्धा लढण्यास पोचले. अनुयायींची संख्या वाढत असतानाच विरोधातसुद्धा वाढ होत होती. मुहम्मद (स.) यांना सत्य स्थापनेसाठी युद्धास सामोरे जावे लागले. अशी एक वेळ आली जेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) विजयध्वज घेऊन मक्केत दाखल झाले. जग हे पाहून थक्क होते की या यशात मुहम्मद (स.) व त्यांचे साथीदार यांच्याद्वारे सूडभावना नाही, रक्तपात नाही, बदला घेणे नाही. कट्टर विरोधक शरणागती पत्करून माना खाली घालून उभे आहेत आणि विजयी फौजेचे सरसेनापती यांनी आदेश दिला की सर्वांना माफी आहे. या महान चारित्र्याने सर्वकाही बदलले. नि:शस्त्र क्रांती झाली. शत्रुपक्ष दोस्त बनला, अनुयायी बनला. हेच अनुयायी इस्लामचा संदेश घेऊन अरबस्थानबाहेर पडले. सत्तेने धुंद हुकुमशाहनी मोर्चा सांभाळला, पण तेथील प्रजेने इस्लाम आवाहनकर्त्यांशी सहानुभूती बाळगली. कारण मुहम्मद (स.) यांची शिकवण समाजातील वंचितांसाठी, दुर्बल घटकांची कैवारी होती. इस्लाममध्ये वंशभेद, रंगभेद, भाषाभेद, जातीयवाद नाही. अरब-अरबेतर असा फरक नाही, मालक-गुलाम आणि श्रीमंत-गरीब यांस थारा नाही. इस्लाम मानवास मानवाच्या गुलामीतून मुक्त करून एक अल्लाहच्या दास्यत्वात आणतो. हे साधे, सोपे, सरळ आवाहन आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी रोमच्या सम्राटांना पत्र पाठवून इस्लाम स्वीकारण्याचे आवाहन केले. इराणच्या शक्तिशाली उद्धट बादशाहकडे आपला दूत पाठवून इस्लाम स्वीकारण्याचे आवाहन केले. रोम व इराण ही त्या काळातील दोन महाशक्ती राष्ट्रे (सुपर पॉवर) होती. जगातील अन्य सर्व सत्ताधीशांना आमंत्रण दिले. इतिहास साक्षी आहे की प्रेषित मुहम्मद (स.) सरतेशेवटी खरे ठरले.

त्या भव्य दिव्य क्रांतीचे आवलोकन करा जी मुहम्मद (स.) यांच्या प्रसारकार्याने

पसरली. सर्वत्र सुख-समाधानाचे वातावरण निर्माण झाले. उच्च-नीच, स्पृश्य-अस्पृश्य आदि भेदभावाचा अंत झाला. मुलगी जन्माचे आनंदाने स्वागत होई. मुलीच्या पालनपोषणामुळे स्वर्गप्राप्तीची खूशखबरी मिळे. महिलांना सन्मान प्राप्त होता. मातेच्या चरणाखाली स्वर्ग आहे, लग्नप्रसंगी वधूस तिच्या सहमतीची विचारणा होई, तिला महर स्वरूपात वरपक्षाकडून स्त्रीधनाचे प्रावधान मिळे. स्त्रियांना पती, पिता आणि पुत्राच्या मालमत्तेत वारसा मिळे. गुलामीची समस्या त्यांना जगण्यासाठी मुक्त करण्याद्वारे सोडवली. राज्यव्यवस्था चालवण्यासाठी खलीफानियुक्ती जनतेच्या आम सहमतीने (बैअत करणे) करण्यात येई. अर्थकारणात व्याजावर पूर्ण प्रतिबंध टाकण्यात आला. श्रीमंतांनी आपल्या धनसंपत्तीत शेकडा अडीच टक्के जकात–वाटा गरिबांना-वंचितांना देणे अनिवार्य होते. साठेबाजी, नफाखोरी, भेसळखोरी इत्यादी आर्थिक अपराधावर बंदी आणण्यात आली. दारू, जुगार, सट्टाबंदी अंमलात आली. चोरी, दरोडे, धोकेबाजी, वजन-मापात लबाडी दंडीत करण्यात आली. वेश्याव्यवसाय, अनैतिक संबंधास मनाई करण्यात आली आणि गुन्हेगारास कडक शासन व दंडाची व्यवस्था करण्यात आली. सुकर, जलदगतीने निष्पक्ष न्याय-निवाड्याची व्यवस्था करण्यात आली. या साऱ्या बाबींवर विचार करा. आदर्श समाज नवनिर्माण यामुळेच झाले. मुहम्मद (स.) यांच्याव्यतिरिक्त अन्य कोणीही असा विश्वनायक व जगाचा नेता सापडत नाही. आजच्या महाभ्रष्टाचारी, अपराधी, पक्षपाती उद्दाम समाजाच्या सुधारणेसाठी या विश्वनायकद्वारा केलेल्या कामगिरी व सफलतापूर्वक संचलित केलेल्या व्यवस्थेची मागणी आजचे वैश्विक अंत:करण करत आहे.

## इस्लामची जीवनव्यवस्था

इस्लाम धर्माची सर्वांत मोठी विशेषत: 'तो एक परिपूर्ण जीवनव्यवस्था' असल्याची आहे. मनुष्याच्या जीवनाचे जे विविध अंग आहेत, क्षेत्रं आहेत, त्यासंबंधी इस्लाम उचित सिद्धान्त, नियमावली, उपनियमावली देतो. पवित्र कुरआन आणि मुहम्मद (स.) द्वारा त्याचा सखोल तपशील, स्पष्टीकरण, त्याची व्याख्या आणि दोहोंवर आधारित व्यावहारिक खुलासा देऊन या जगात मानवास जगण्यासाठी जीवनव्यवस्थेचे मार्गदर्शन करण्यात आले आहे, हे अखिल मानवजातीसाठी वरदान आहे. ही जीवनव्यवस्था मानवाच्या स्वाभाविक पूर्ततेसाठी अनुकूल आहे. ही जीवनव्यवस्था अत्यंत संतुलित आणि मध्यममार्गी आहे. मनुष्याची भौतिक आणि आध्यात्मिक समाधानाची शिकवण यात आहे. मानवी गरजा व आवश्यकता पूर्ण होतात. या ठिकाणी थोडक्यात नैतिक, सामाजिक, आर्थिक, राजकीय आणि आध्यात्मिक व्यवस्थेवर दृष्टिक्षेप टाकण्यात आला आहे.

## १) इस्लामची नैतिक व्यवस्था

सर्व धर्मांत, संप्रदायांत पाप-पुण्य, सद्गुण-दुर्गुणांविषयी विचार आढळतो. इस्लाम तो मान्य करतो. सत्य, न्याय, दिलेले वचन पाळणे, कर्तव्यपालन करणे त्यात सामील आहेत. परस्पर सहयोग, कायद्याविषयी शिस्तबद्धता, संयम, धैर्य, शूरता, वीरता हे प्रशंसनीय गुण आहेत. लबाडी, खोटा व्यवहार, धोका देणे, चोरी, दरोडेखोरी, अत्याचार, जुलुम, व्यभिचार, लाचलुचपत, भ्रष्टाचार, आरोप-प्रत्यारोप इत्यादींविषयी मनाई आहे. मात्र नैतिकतेविषयी इस्लामचा दृष्टिकोन विशेषत: चार प्रकारे मांडला जातो-

(१) जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात इस्लामने नैतिकतेला प्राधान्य दिले आहे. नैतिकता अनिवार्य आहे. व्यक्तिगत देवाणघेवाण, कौटुंबिक जबाबदाऱ्या, सामाजिक कर्तव्य, परस्पर व्यवहार यासह शासन-प्रशासन, राजनीती इथपावेतो रणांगणात सत्यता, प्रामाणिकपणा, न्याय आणि उदारता धारण करावी. याचे उल्लंघन करता कामा नये, यासंबंधी आदेश आहेत.

(२) नैतिकतेचा मार्ग सोपा नाही. इस्लाम हे गुण अंत:करणात बिंबवण्यासाठी ईश्वराची प्रसन्नता लाभेल, मरणोत्तर पारलौकिक जीवन सफल होईल अशी तत्त्वे देतो. कोणत्याही बाह्य दडपणाशिवाय मनुष्यास नैतिकता अंगीकारण्यासाठी ईशभय बाळगणे, परलोकी स्वर्ग मिळेल अशी मांडणी करतो. जर मरणोत्तर जीवनातील अंतिम न्याय-निवाड्यावर विश्वास नसेल तर मनुष्य जास्त वेळ सन्मार्गावर, सदाचाराच्या नियमावर टिकू शकत नाही. कोणत्या-न-कोणत्याही क्षणी तो हिंमत हरवून बसतो.

(३) मुस्लिम समुदायाचे आद्य कर्तव्य आहे, त्यांनी संघटितपणे प्रयत्नाची पराकाष्ठा करून सद्गुणास, सदाचारास फैलवावे आणि दुर्गुणाचे, अनाचाराचे उच्चाटन करावे. नैतिकतेस बळ देणे सर्वांचे कर्तव्य आहे. समाजाचा उत्कर्ष व ऱ्हास नैतिकतेवर आधारित आहे.

(४) समाजात काही असामाजिक तत्त्वे असलेली माणसे असतात. सभ्यतेची भाषा त्यांना अवगत नाही. त्याचा वाईट प्रभाव समाजावर पडू नये आणि त्या दुष्टांनी सन्मार्ग पत्करावा यासाठी अंतिम पर्याय त्यांच्यावर दंडात्मक कार्यवाही करणे हा आहे.

## २) इस्लामची राजकीय व्यवस्था

इस्लामचा सिद्धान्त आहे, ''सार्वभौम सत्ताधीश एकमेव अल्लाह आहे.'' मनुष्य भूतलावर त्याचा प्रतिनिधी आहे. अल्लाहच्या हुकुमानुसार, आज्ञेनुसार जनतेचे विश्वासू प्रतिनिधी खलीफा (इस्लामी शासक) सल्लागार मंडळाच्या सल्लामसलतीने राजकीय व्यवस्था पाहतील. हे कामकाज निष्पक्ष असेल. सर्व नागरिकांना समान दर्जा प्राप्त असेल.

न्यायालय राजकीय सत्ताधिकारीच्या अधीन नसून ते स्वतंत्र असेल. जनतेसाठी कल्याणकारी राज्याची स्थापना केली जाईल. राजकीय खजिन्यातून (कोषागारातून) गरीब, विधवा, अनाथ, अपंग आणि असहाय लोकांची पूर्ण देखभाल करण्यात येईल. जनतेने अविश्वास प्रकट केला तर खलीफास पदत्याग करावा लागेल. खलीफा, सल्लागार मंडळ व जनता हे सर्वजण अल्लाहसमोर उत्तरदायी आहेत. कुरआन आणि हदीस (मुहम्मद स. यांच्या शिकवणी) शिवाय कोणताही कायदा चालणार नाही. (उदा॰ सर्वसंमतीनेदेखील दारूस वैध करता येणार नाही. कारण दारू कुरआननुसार निषिद्ध आहे.) वर्तमानकाळच्या नवनवीन समस्यांचे निराकरण, ज्यांचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दाखला मिळत नाही, त्यास इस्लामी शिकवणीच्या चेतना व निष्ठेतून (स्पिरिट) मार्ग काढला जाईल. या व्यवस्थेत भ्रष्टाचार, पक्षपात, अन्याय, शोषण या गोष्टींना थारा नसेल. मानवाधिकारांचे पूर्ण रक्षण करण्यात येईल. अन्य धर्मियांचे प्राण-माल सुरक्षित राहतील. त्यांच्या वैयक्तिक कायद्यांत ढवळाढवळ होणार नाही. या व्यवस्थेचे आचरणरुपी आदर्श इतिहासाच्या पानांत मुहम्मद (स.) आणि प्रथम चार खलीफा माननीय अबुबक्र सिद्दीक (र.), मा. उमर (र.), मा. उस्मान (र.) आणि मा. अली (र.) यांच्या कारकिर्दीत पाहण्यास मिळतो.

## ३) इस्लामची कौटुंबिक व्यवस्था

इस्लाम कुटुंबास फार महत्त्व देतो. कुटुंब हे समाजरुपी इमारतीचा पाया आहे. 'कुटुंब' स्त्री-पुरुष यांचे सामाजिक मान्यतेद्वारा विधिवत विवाहाने बनते. अवैध, विवाहबाह्य, व्यभिचार अशा संबंधास कठोर दंड दिला जातो. कुटुंब पुरुषप्रधान असेल. अनुशासन व्यवहार पुरुषामार्फत होतो. स्त्रीस कुटुंबात मानाचा, आदराचा सन्मान मिळेल. संततीने आई-वडिलांची सेवा करावी. संततीने आई-वडिलांचे आज्ञापालन करावे. सेवेत आईला वर्चस्व आहे. माता मूल जन्मास घालते व मुलांचे पालनपोषण करते. अनेक कष्ट सहन करते. मुलांना मुलीपेक्षा श्रेष्ठत्व दिले जाणार नाही. मुलींचे योग्य प्रशिक्षण व सांभाळ केल्याने स्वर्गप्राप्तीची खूशखबरी आहे. विवाहप्रसंगी मुलीची संमती, सहमती घेतली जाते. वधूस पतीकडून महरची रक्कम प्राप्त करण्याचा अधिकार आहे. आई-वडिलांची ही जबाबदारी आहे, त्यांनी मुलाबाळांचे उच्च प्रशिक्षण करावे, उत्तम संस्कार द्यावेत, शिक्षण व ज्ञानप्राप्तीची योग्य सोय करावी. हीच भावी पिढी असल्याने आदर्श समाज निर्माण होऊ शकतो. हीच संतान भावी आयुष्यात देशाचा उत्तम नागरिक, उत्तम माणूस आणि सच्चा मुस्लिम बनणार. पति-पत्नीचे संबंध विकोपास गेले, बिघडले, सामंजस्याचा समझोता असफल झाला, अशा वेळी दुःखाने घ्यावा लागणारा शेवटचा पर्याय तलाक (घटस्फोट) ची परवानगी आहे.

## ४) इस्लामची सामाजिक व्यवस्था

माणूस सामाजिक जीवन जगण्यास बाध्य आहे. यासाठी समाजात परस्पर आत्मियता, सहानुभूती, बंधुत्व, एकदुसऱ्यावर विश्वास, सुखशांतीचे वातावरण असणे आवश्यक आहे. इस्लामच्या सार्वभौमिक शिकवणींत सर्वांचे परस्पर नाते बंधुत्वाचे आहे. सर्वजण एकाच माता-पित्याची संतान आहेत. त्यांच्यात परस्पर रंग, जात, वंश, भाषा, धनसंपत्तीच्या आधारावर भेदभाव केला जाऊ शकत नाही. यास्तव समाजात एकमेकास खांद्याला खांदा लावून जगण्याचे निर्देश आहेत. मक्का येथील हजप्रसंगी अखिल जगतांचे लोक एकसमान वस्त्रात, पोषाखात अल्लाहची भक्ती करतात. स्त्री-पुरुष यांच्या संबंधासाठी 'विवाह' अनिवार्य आहे, मुक्त वासना व्यभिचाराने कुटुंब निर्माण होत नाही. समाज दूषित होतो. यास्तव कठोर शिक्षेचे प्रयोजन आहे जरी हे संबंध परस्पर मर्जीने का असेनात. शेजारी मग तो कोणत्याही जाती-धर्माचा असो त्याशी सद्व्यवहार केला पाहिजे. सामाजिक पुण्य व भल्या कामासाठी मुस्लिमांनी प्रयत्न केला पाहिजे, साथ दिली पाहिजे, सहयोग केला पाहिजे. जुलुम आणि अत्याचार विरोधात आवाज उठविणे, सर्वांना न्याय मिळण्यास प्रयत्न करणे आवश्यक आहे. आपला समुदाय जर चुकत असेल तर त्यास त्यापासून परावृत्त करावे, सर्व नैतिक मूल्यांना, सिद्धान्तांना प्रचलित करण्यास इस्लाम कटीबद्ध आहे.

## ५) इस्लामची आर्थिक व्यवस्था

इस्लाम आर्थिक क्षेत्रातसुद्धा नैतिकेचा पाठिराखा आहे. आर्थिक सुबत्तेचे, संपन्नतेचे हे परिमाण नाही की उत्पादनात किंवा प्रति माणसाच्या उत्पन्नात किती वाढ झाली, तर आर्थिक संपन्नता यावर आधारित असावी की समाजातील अत्यंत शेवटच्या घटकाची मूलभूत आवश्यकता पूर्ण होते की नाही. या क्षेत्रात व्याजाचा कोणताही प्रकार अवैध आहे. व्याज ही मानवताविरोधी अन्यायी प्रथा आहे. जे धंद्यासाठी भागभांडवल गुंतवणूक करू इच्छितात त्यांनी धंद्याच्या नफा व तोटा दोन्हींसाठी जोखीम पत्करावी. जगातील व्यवहारात कोणत्याही मालासंबंधी शंभर टक्के पूर्वअनुमान शक्य नाही तर धनवानाच्या धनावर पूर्वनिर्धारित व्याज दर आकारण्याचे कोणतेच औचित्य नाही. या कारणाबरोबरच आणखीन कारणाने इस्लाम व्याजांच्या व्यवहारास संपूर्णतः निषिद्ध घोषित करतो. जुगार, लॉटरी, मटका, सट्टा आणि समाजास बिघडविणारे सर्व कारभार उदा॰ दारू, अश्लीलता पसरविणारे मनोरंजनाचे प्रकार इत्यादी सर्वांना इस्लाम प्रतिबंधित करतो. श्रीमंताकडून त्यांच्या जमा मिळकतीवर शेकडा अडीच टक्के जकात (अनिवार्य दान) वसूल करून त्यास गरिबांच्या आवश्यकता पूर्ततेसाठी वितरीत करण्याची अद्वितीय व्यवस्था (बैतुलमाल)

करण्यात येते. अनिवार्य दान देऊन आणखीन जादा दान श्रीमंतांनी गरीबास द्यावे, यास उत्तेजन दिले जाते. त्यांनी स्वेच्छेने अतिरिक्त दान वंचितांना, पीडितांना देण्यास प्रयत्नशील राहावे असे प्रेरित केले जाते. (त्यास ईमानधारक स्वखुशीने तयार असतो.) अपव्यय टाळणे आणि अनावश्यक उपकाराचा देखावा करणे मान्य नाही. कारण हा खर्च मुळात गरजवंतांना मदत स्वरूपात द्यावा. आर्थिक अपराध उदा॰ साठेबाजी, काळाबाजार, भेसळ, वजनकाट्यात हेराफेरीसाठी कठोर शिक्षा दिली जाते. वारसा संपत्ती मुलगा, मुलगी आणि अन्य वारसाधारकांना वितरीत केली जाते ज्यामुळे संपत्ती एकवटली जात नाही. इस्लामी शिकवणीनुसार मजुराची मजुरी आणि कर्मचाऱ्यांचा पगार आधी ठरवून वेळेवर त्याचे वाटप झाले पाहिजे.

## ६) इस्लामची न्यायिक (कायदेविषयी) व्यवस्था

ईशग्रंथ कुरआन आणि मुहम्मद (स.) यांच्या शिकवणी आणि आचरणानुसार इस्लामने जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात न्यायिक, कायदेशीर स्वरूप निश्चित केले आहे. या मर्यादेच्या अंतर्गत राहून नवीन आवाहने, नवीन घडामोडी, नवीन समस्यांविषयी विस्तृत नियम देता येतात. हा नियम, कायदा असून प्रत्येक स्थळ-काळासंबंधी शाश्वत आहे. इस्लामी कायदे ईशनिर्मित असल्याने लोकांच्या मनात याविषयी नितांत आदर असतो. या कायद्याचे प्रकार असे आहेत.

**दंडसंहिता** - चोरी, व्यभिचार, आरोप-प्रत्यारोप, खोटी साक्ष, लाचलुचपत, या गुन्ह्यांसाठी कठोर कारवाई होते, जेणेकरून गुन्हेगाराचा थरकांप उडतो.

**कौटुंबिक** - विवाह, तलाक (घटस्फोट), वारसाहक्कासंबंधी.

**नागरिक** - मालमत्ता, इज्जतअब्रूची प्रतिष्ठा, कोणास हीन लेखून चेष्टा न करणे, कोणास वाईट नावाने हाक न मारणे, पाठीमागे निंदानालस्ती न करणे, एखाद्यासंबंधी वाईट धारणा न बाळगणे इत्यादीविषयी नियम.

**श्रम-मेहनत** - मजुरी आधीच ठरवणे, घाम वाळण्यापूर्वी मजुराची मजुरी (विनाविलंब) देणे, मजुरावर त्याच्या सामर्थ्यापेक्षा अधिक ओझे न टाकणे, मजुर किंवा कर्मचारी आपल्या अमानतीत (दिलेल्या जबाबदारीत) अपहार न करणे आणि चोरी-लबाडी न करणे.

**आर्थिक** - सर्व ठराव लिखित स्वरूपात साक्षीदारांच्या सहीने होतील. व्याज निषिद्ध, जुगार, सट्टा, मटका, लॉटरी यावर बंदी असेल. भेसळ, साठेबाजी, वजन करण्यात हेराफेरीवर सजा देण्यात येईल. देवाण-घेवाण, खरेदी-विक्रीचे नियम असतील. शेतीविषयक, जमिनीविषयक (स्थावर मालमत्ता), बट्ट (पाती), हिश्शेदारीचे नियम असतील, उधार

देवाण-घेवाणीची पद्धत ठरवली जाईल.

### ७) इस्लामची आध्यात्मिक व्यवस्था

इस्लाम मनुष्य जीवनास आध्यात्मिक आणि भौतिक या विभागांत वेगवेगळी वाटणी करत नाही. माणसाची आध्यात्मिक वाटचाल ही या जगातील जीवनातून प्रगतीपथावर जाते, म्हणून सन्याशी बनणे, संसार त्याग करणेस संमती नाही. पालनकर्ता ईश्वराचे दास्यत्व स्वीकारणे आत्म्याची गरज आहे. याकरिताच नमाज, रोजा, जकात आणि हज या उपासनेच्या, भक्तीच्या विधी आहेत. जीवन कसोटी आहे, परीक्षा आहे. तुम्हाला जीवनात आजमाविले जाईल. बाजारात, कार्यालयात, घर-कुटुंबात, न्यायालयात तुम्ही अल्लाहचे आज्ञापालन करणारे आहात. तेथे तुम्ही प्रामाणिकपणे, सचोटीने, कर्तव्यदक्षपणे कार्य करावे. असे जर असेल तर तुम्ही आध्यात्मिक प्रगतीच्या वाटेवर आहात नसता नाहीत. मशीदीत अल्लाहचे आज्ञापालन आणि मशीदीबाहेरील व्यवहारात अल्लाहची अवज्ञा अशी दुटप्पी धोरणाच्या संगतीस मान्यता नाही. तुम्ही अल्लाहवर श्रद्धा ठेवता तर आवश्यक आहे की त्याच्या आज्ञेनुसार वागले पाहिजे. व्यवहारात त्याची प्रत्यक्ष अंमलबजावणी केली पाहिजे. स्वत:स अल्लाहसमोर अंत:करणात, विचारात जशी जवळीक करता तशी निकटता आचरणात समर्पित झाली पाहिजे तेव्हाच तुम्ही आध्यात्मिकतेत अग्रेसर व्हाल.

वरील संक्षिप्त चर्चेत हे स्पष्ट होते की इस्लाम जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात नियम-कायदे देतो. मूलतत्त्वे, मुलाधार अपरिवर्तीत ठेवतो. दुसरे महत्त्वपूर्ण तथ्य असे की, अन्य कोणत्याही जीवनप्रणालीच्या तुलनेत इस्लामी जीवनप्रणाली अत्यंत दृढ, मजबुत आहे. इस्लामशिवाय अन्य कायद्यांमागे फक्त सामाजिक दबाव आणि शासन-प्रशासनाच्या दडपणाव्यतिरिक्त दुसरी बाब नसते, परंतु इस्लामी कायदे-नियमाच्या पालन केल्यास ईशप्रसन्नता आणि पारलौकिक बक्षिसाची हमी असते. तथा इस्लामी कायदेकानूचे उल्लंघन केल्यास ईशक्रोधता मिळते आणि पारलौकिक शिक्षेची सजा दिली जाईल. या स्वर्ग-नरकाच्या बक्षिसाने वा शिक्षेने एक शक्तिशाली वैशिष्ट्यपूर्ण सांगता या व्यवस्थेत आहे.

## इस्लाम आणि मुस्लिमेतर समाज

इस्लाम भूतलावर मानवतेसाठी अल्लाहकडून अवतरित परिपूर्ण जीवनव्यवस्था आहे. याबरोबरच असे पण आहे की प्रत्येक काळी इस्लामचा स्वीकार करणाऱ्याबरोबर नकार देणारे अर्थात मुस्लिम आणि मुस्लिमेतर दोन गट आहेत. इस्लामला न मानण्याविषयीची कोणती भूमिका इस्लाम घेतो, हे आपण जाणून घेऊ.

मनुष्याचा जन्म व त्याचे अस्तित्व या जगात पूर्ण स्वातंत्र्यासह जगण्याचे आहे.

त्याच्यासमोर संपूर्ण जीवनाची सत्यता व त्याचे वास्तविक स्वरूप ठेवण्यात आले. तद्नंतर मनुष्यास याची पूर्ण मुभा आहे की त्याने इस्लाम स्वीकार करावा किंवा अस्वीकार करावा. अल्लाहने जबरदस्तीने मार्गदर्शन देण्याची पद्धत अवलंबिली नाही. सत्य मार्ग व असत्य मार्ग आणि त्यावर चालण्याची फलनिष्पत्ती लोकांसमोर ठेवली. त्यांना चयन करण्याचे स्वातंत्र्य दिले. इस्लाम सर्वतोपरी लोकांसमोर ठेवण्यात आला. जे लोक इस्लाम मानणार नाही, त्यांच्याशी कोणताही तंटा नाही, त्यांच्याशी संबंध तोडले जाणार नाही, ते लोक ज्याची पूजा करतात त्यांना वाईट बोलायचे नाही, त्यांची मने दुखविली जाणार नाही, ही आहे इस्लामची शिकवण. कुरआन सांगतो,

"स्पष्ट सांगून टाका, हे (इस्लाम) सत्य आहे तुमच्या पालनकर्त्याकडून, मग जो कोणी मनाने स्वीकार करो किंवा नकार देवो. (कुरआन-१८:२९)

"हे लोक अल्लाहशिवाय अन्य दुसऱ्यांचा धावा करतात त्यांना वाईट बोलू नका." (कुरआन-६:१०८)

"धर्माच्या बाबतीत कोणतीही जोरजबरदस्ती नाही." (कुरआन-२:२५६)

ज्या देशात इस्लामी राज्य आहे, त्याचे हे कर्तव्य आहे की त्यांनी इस्लामला न मानणाऱ्यासदेखील देशाचा सन्मानजनक नागरिक मानावे. त्यांना त्यांचे अधिकार द्या. त्यांचे प्राण, मालमत्ता आणि पूजास्थळांच्या रक्षणाची व्यवस्था करा.

## इस्लाम आणि जिहाद

पाश्चिमात्य देशांनी आपल्या सत्तेच्या धुंदीत जिहादविरूद्ध खूप अपप्रचार केला आहे. त्यांनी जिहादचे आक्राळविक्राळ स्वरूप मांडले. हे सर्व अशा वेळी घडत आहे ज्या वेळी वस्तुत: सारे जग त्यांच्याच क्रूर अत्याचाराने पीडित आहे. आजचे हे सत्य विदारक आहे की यूरोप आणि अमेरिका आपल्या आर्थिक आणि राजकीय स्वार्थासाठी मिसाइल, अणुबॉम्ब, गगनभेदी विमाने, टँक, युद्धसामुग्री आणि आधुनिक हत्याराने वाटेल त्या देशावर तुटून पडतात.

जिहाद अरबी भाषेचा शब्द आहे. अपार कष्ट, प्रयत्नाची पराकाष्ठा करणे, असा प्रयत्न करणे ज्यांत कोणतीच कमरतरता नसावी, इथपावेतो की प्राण अर्पण करण्याची वेळ आली तर त्यापासून मागे न वळावे. जिहाद केवळ युद्धाच्या रणांगणात होत नाही तर जिहाद वस्तुत: त्या कसोशीच्या प्रयत्नास म्हणतात जो अल्लाहच्या धर्मास फैलावण्यासाठी, अल्लाहच्या मर्जीखातर आदर्श समाजनिर्मितीसाठी केला जातो. या प्रयत्नात कधी हत्यार उपसण्याची वेळसुद्धा येऊ शकते. परंतु मूलत: जिहाद लढाईच्या हत्याराने होत नाही.

कुरआनने कित्येक वेळा जिहादचे आवाहन केले आहे, केवळ जीवानिशी नव्हे तर धनसंपत्ती, मालमत्तेसह जिहाद करण्यास सांगितले. इस्लाम ज्या वेळी आपल्या अनुयायींना जिहादचे आवाहन करतो त्याचा अर्थ होतो जमिनीवरील भांडणे, उपद्रव, तंटे आणि अन्याय निवारणार्थ जोरदार प्रयत्न केला पाहिजे, जे काही तुमच्यापाशी आहे, सर्वांनिशी हा प्रयत्न झाला पाहिजे. येथे जाणून घेणे आवश्यक आहे की सशस्त्र जिहाद केवळ शासकाच्या परवानगीने व नेतृत्वात लढला जातो. त्याचप्रमाणे इस्लामी जिहादसाठी फौज आणि शासकाला (नेतृत्वाला) काही नैतिक मूल्यांची आणि शिकवणींची अट घातली गेली. उदा॰ महिला, वृद्ध माणसे, मुले, इत्यादींवर हात टाकता कामा नये. पिकांना-फळांना नुकसान पोचवू नये, इत्यादी. जिहादविषयी सविस्तर माहिती अन्य इस्लामी ग्रंथांतून प्राप्त होऊ शकते.

## इस्लाम आणि स्त्री

इस्लामची स्त्रीविषयी भूमिका हा बहुचर्चित विषय आहे. हा इस्लामवर आरोप आहे की इस्लामची भूमिका महिलांविषयक पक्षपाती आहे. अशा आरोपांचा स्वर मूलतः पाश्चिमात्य राष्ट्रांतून उमटतो.

पाश्चिमात्य राष्ट्रे महिलांशी जो अभद्र व्यवहार करतात, त्यांच्या शील, चारित्र्य, लाज-लज्जेचे पावित्र जोपासत नाही, त्या लोकांची जर अशी इच्छा असेल की इस्लामने पण असाच स्त्रियांच्या इज्जतअब्रुशी व्यवहार करावा तर त्याचे उत्तर इस्लामकडून स्पष्ट शब्दांत 'अजिबात, कदापि नाही' असेच देण्यात येईल. दोहोंच्या संस्कृती एकमेकांविरूद्ध आहेत. इस्लाम महिलांना संरक्षण देतो, त्यांची शीलता, शालीनता, गौरव, प्रतिष्ठा सन्मानाची जोपासना करतो. इस्लामची महिलांविषयक तुलना पाश्चिमात्य संस्कृतीशी होऊच शकत नाही कारण पाश्चिमात्यांनी महिलांना वेश्या, कॉलगर्ल्स बनविले आहे. पाश्चिमात्य देशांनी स्त्रियांना आपल्या भोगवृत्तीसाठी नग्न केले, तेव्हा पाश्चिमात्य परिणामाशी इस्लामी महिला कशी उतरू शकेल! आम्ही हे पण नमूद करू इच्छितो की मुस्लिम समाजात आज काही महिलांना कोठेतरी ते अधिकार प्राप्त नाहीत, जो इस्लाम त्यांना देतो. म्हणून महिलांना कठीण प्रसंगाशी सामना करावा लागतो. त्याचे उत्तर असे की त्या महिला आणि पुरुष इस्लामने दिलेल्या अधिकार व कर्तव्याची जाण ठेवत नाहीत व त्यानुसार आचरण करीत नाहीत.

इस्लामी कायद्यानुसार महिलांना व पुरुषांना, दोहोंना समान अधिकार प्राप्त आहेत. हे निर्विवाद सत्य आहे की ईश्वराने दोहोंच्या रचनेत शारीरिक आणि मानसिक

फरक ठेवला आहे. हे लक्षात असू द्या. त्यावरून असे कळून येते की दोहोंचे कार्यक्षेत्र आणि जबाबदाऱ्या त्यानुसार आहेत. इस्लाम महिलांचा सन्मान करतो. त्यांच्या संरक्षणाची पूर्ण व्यवस्था करतो.

## इस्लाम आणि मानवाधिकार

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या अंतिम हजच्या वेळी सव्वा लक्ष अनुयायींसमोर जे ऐतिहासिक महत्त्वपूर्ण प्रवचन दिले, ते हदीसग्रंथात पूर्णपणे सुरक्षित आहे. या प्रवचनातील आदेश-निर्देशांत मानवाधिकाराची अशी सनद आहे ज्याचे उदाहरण पूर्वी आणि आजसुद्धा देता येत नाही. या सनदीचे वैशिष्ट्य असे की यातील आदेशाची अंमलबजावणी पूर्णपणे अंमलात आलेली आहे. संक्षिप्तपणे या प्रवचनात सार प्रस्तुत आहे. प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले,

"लोकहो, माझे म्हणणे लक्षपूर्वक ऐका. शक्य आहे पुढील वर्षी या ठिकाणी तुमच्याशी माझी भेट होणार नाही. अज्ञानकाळातील (प्रेषितपूर्व काळातील रानटी प्रकार) सर्व चालीरिती, रुढी-परंपरा मी पायाखाली तुडवतो. (अर्थात त्या सर्व रद्द झाल्या आहेत.) लोकहो, तुम्हा सर्वांचा एकच ईश्वर 'अल्लाह' आहे. तुम्ही सर्वजण एकच आई-वडिलांची संतान आहात. कोणत्याही अरबवासीयाचे अरबेतरावर वर्चस्व नाही, कोणत्या गोऱ्या व्यक्तीला कांळ्या वर्णावर वर्चस्व नाही, वर्चस्व, मोठेपण केवळ त्यालाच लाभेल ज्याच्या मनी-अंत:करणी जीवन जगताना अल्लाहचे भय जास्त असेल.

प्रत्येक मुस्लिम दुसऱ्या मुस्लिमाचा बंधु आहे. लोकहो, तुमची धनसंपत्ती-माल एकदुसऱ्यावर हराम आहे. (ती नाहक, हिरावून घेऊ नये. एकमेकांचा प्राण व धन बळजबरीने घेणे हराम आहे.)

अपराधी आपल्या दोषांस स्वयं जबाबदार आहे. त्याचा सूड पिता वा पुत्रावर उगवला जाणार नाही.

तुमच्या गुलामांना (नोकरांना) तेच खावयास द्या जे तुम्ही खाता, तेच वस्त्र द्या जे तुम्ही वापरता.

अज्ञानकाळातील सर्व हत्याप्रकरणे (ज्यात बदला घेण्याचे चक्र सतत चालू असे) बाद, रद्द केली जात आहेत. व्याजाची सर्व प्रकरणे बंद करण्यात येत आहेत, मुद्दल तुम्ही घेऊ शकता. सुरुवात म्हणून मी माझ्या परिवारातील अब्बास बिन अब्दुल मुत्तलीब यांची सावकारी (व्याज) संपवतो.

हे लोकहो, तुमचा पत्नीवर अधिकार आहे तसा पत्नीचा तुमच्यावर अधिकार आहे. पत्नीने तुमच्या शयनकक्षात दुसऱ्यांना येऊ देऊ नये, हे अनिवार्य आहे की अश्लीलतेचे कोणतेही कृत्य करू नये. मी तुम्हाला ताकीद करतो की महिलांच्या बाबतीत त्यांच्याशी सद्व्यवहार करा. (भलेपणाने वागा.)

हे लोकहो, माझ्यानंतर कोणताही दुसरा पैगंबर (प्रेषित) येणे नाही. तुमच्यानंतर अन्य दुसरा लोकसमुदाय पण नाही. केवळ एक अल्लाहची उपासना-आराधना करा. पाच वेळेस नमाज अदा करा. रमजान महिन्यात रोजे पाळा. आपल्या मालातून शुद्ध मनाने जकात द्या. हज करा. आपल्या अमीरचे (इस्लामी शासकाचे) आज्ञापालन करा, तुम्हास स्वर्ग मिळेल. जर तुमचा अमीर (शासक) नकटा वा निग्रो, असेल मात्र तो अल्लाहचा ग्रंथ कुरआनुसार राज्य करणारा असेल तर त्याचे ऐका व त्याचे आज्ञापालन करा.

मी तुमच्या दरम्यान अशी वस्तु सोडून जात आहे, ज्यास दृढतेने धरून ठेवल्यास तुम्ही कधीही मार्गभ्रष्ट होणार नाही- ती गोष्ट आहे अल्लाहचा ग्रंथ कुरआन आणि माझे (प्रेषित मुहम्मद स.) हदीस (आचरण, अनुकरण व व्यवहार कथन).

लोकहो, उपस्थित अनुयायींनी या उपदेशास त्या लोकांपर्यंत पोचते करावे, जे या ठिकाणी उपस्थित नाहीत.''

## उपसंहार

पुस्तिकेच्या संक्षिप्त वर्णनात स्पष्ट होते की इस्लाम केवळ मुस्लिमांपुरता धर्म नाही तर इस्लाम हा धर्म अल्लाहकडून संपूर्ण मानवतेस देण्यात आलेली जीवनव्यवस्था आहे, जीवनप्रणाली आहे. इस्लामला समजण्यासाठी, आकलन करण्यासाठी, अभ्यास करण्यासाठी मुस्लिमांच्या व्यवहारास, इतिहासकारास किंवा एखाद्या लेखकाच्या विचारास आधारभूत बनवू नका. कृपया, तुम्ही व्यक्तीश:, स्वत: इस्लामचे मूळस्त्रोत कुरआन आणि मुहम्मद (स.) यांच्या हदीस शिकवणीला आधारभूत बनवा.

आपणास ही विचारप्रणाली तर्कसंगत वाटत असेल, मनास अपील करणारी वाटत असेल, सुख, शांती, समाधान देणारी, आपल्या संकटांना, समस्यांना, प्रश्नांना, तणावाला निवारण करणारी असेल तर याद्वारे आपला प्रभु 'अल्लाह'ची कृपा प्राप्त करा. यासंबंधी गांभीर्याने इस्लामचा विचार करावा.

*- ० - समाप्त - ० -*